**राज्यात शैक्षणिक आणि आरोग्य सेवा केंद्र (Educational & Healthcare Hub) स्थापन करण्यासाठी धोरणात्मक फ्रेमवर्कची शिफारस करण्याकरिता समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११/का-१४१२,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. २५ मार्च, २०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील ४८% लोकसंख्या ही २४ वर्षांपेक्षा कमी वयोगटातील आहे. या वयोगटामध्ये नवीन तंत्रज्ञान, इंटरनेट यासारख्या सुविधांच्या वापराचे प्रमाण लक्षणीय आहे. गतिमान परिस्थितीत उद्योगांच्या कुशल आणि अकुशल मनुष्यबळाच्या गरजा हाताळण्यासाठी राज्यात दर्जेदार शिक्षण, कौशल्य आणि संशोधन आणि विकास संस्था (शैक्षणिक हब) स्थापन होणे गरजेचे आहे. हे हब आपल्या तरुणांच्या सक्षमीकरणासाठीच नव्हे तर आंतरराष्ट्रीय विद्यार्थ्यांनासुद्धा आपल्या देशाकडे आकर्षित करणार आहेत.

नवीन शैक्षणिक धोरण २०२० मुळे, जगातील सर्वोच्च १०० विद्यापीठांना भारतात कार्यरत होणे शक्य होणार आहे. महाराष्ट्राने या संधीचा फायदा घेऊन या विद्यापीठांना त्यांचे केंद्र राज्यात स्थापन करण्यासाठी पूर्व तयारी करणे आवश्यक आहे. ही जागतिक सर्वोच्च शैक्षणिक विद्यापीठे, उत्कृष्ट प्रतिभा आणि जगातील सर्वोत्तम पद्धती राज्याच्या शैक्षणिक व्यवस्थेत आणतील ज्यामुळे राज्यातील विद्यार्थ्यांना प्रशिक्षित करुन त्यांचे भविष्य उज्ज्वल होणार आहे. अशा शैक्षणिक केंद्रांमुळे ब्लू-चिप कॉर्पोरेट्सना गरजेचे असलेले दर्जेदार शिक्षित आणि कुशल मनुष्यबळाचा पुरवठा करणारी रोजगार केंद्रे तयार होणार आहेत. अशा शैक्षणिक संस्थांचा आणखी एक फायदा म्हणजे त्या परिसरातील स्थानिक आर्थिक विकासाला कारणीभूत ठरतात आणि त्याद्वारे राज्य आणि देशाच्या अर्थव्यवस्थेमध्ये भरीव योगदान देतात.

अलीकडच्या काळात, महाराष्ट्र हे रुग्णांना मिळणाऱ्या सेवांची उत्तम गुणवत्ता, उच्च श्रेणी, आधुनिक तंत्रज्ञान, आंतरराष्ट्रीय दर्जाच्या मानकांचे पालन तसेच कमी खर्च यासारख्या विविध घटकांमुळे वैद्यकीय उपचारांसाठी सर्वात विश्वासार्ह ठिकाण म्हणून विकसित झाले आहे. महाराष्ट्रातील राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावर मान्यताप्राप्त रुग्णालयांमध्ये नामांकित वैद्यकीय तज्ञांद्वारे नाममात्र किंमतीत क्लिष्ट शस्त्रक्रिया केल्या जातात. ज्यामुळे देशात उत्तम दर्जाच्या सार्वत्रिक आरोग्य सेवांची व्याप्ती ही महाराष्ट्रात सर्वात जास्त आहे. उपचार पध्दतीची गुणवत्ता आणि उपलब्ध असलेले पर्याय,

पायाभूत सुविधा आणि कोणतीही वैद्यकीय प्रक्रिया करण्यासाठी कुशल मनुष्यबळ इ. सारख्या अनेक सुविधांमुळे वैद्यकीय उपचारांसाठी महाराष्ट्रात येणाऱ्यांची संख्या मोठ्या प्रमाणावर आहे. दुर्धर आजाराने ग्रस्त असलेल्या रुग्णांसाठी देखभाल, पुनर्वसन, शस्त्रक्रिया पुर्व व पश्चात काळजी यासारख्या सेवा आणि सुविधांनी राज्य सुसज्ज आहे. त्यामुळे, वैद्यकीय पर्यटनासाठी राज्याला एक पसंतीचे ठिकाण बनवण्यासाठी रुग्णालय आणि आरोग्य सेवा संस्थांसोबत एकत्रितपणे काम करण्याच्या दिशेने सकारात्मक पावले उचलणे महाराष्ट्रासाठी महत्त्वाचे आहे. सर्व सेवा-सुविधा एकत्रितपणे एका ठिकाणी उपलब्ध करुन देण्यासाठी "एकात्मिक हेल्थकेअर हब" स्थापन करण्याची गरज आहे.

राज्यात प्रत्येकी १००० एकर जमीन पार्सल असलेली ग्रीनफिल्ड आणि ब्राऊनफिल्ड शैक्षणिक तसेच आरोग्य सेवा केंद्रे नागपूर, औरंगाबाद आणि नवी मुंबई या ३ ठिकाणी विकसित करण्याचे प्रस्तावित आहे. ही शैक्षणिक आणि आरोग्य सेवा केंद्रे विकसित करण्यासाठी धोरणात्मक फ्रेमवर्कची शिफारस करण्यासाठी राज्यस्तरावर समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात प्रत्येकी १००० एकर जमीन पार्सल असलेली ३ ठिकाणे- नागपूर, औरंगाबाद आणि नवी मुंबई येथे शैक्षणिक आणि आरोग्य सेवा केंद्रे विकसित करण्यात येणार आहेत. शैक्षणिक केंद्रांमध्ये सरकारी आणि खाजगी शाळा, महाविद्यालये, कौशल्य, संशोधन संस्था इत्यादींचा समावेश असेल. तसेच, हेल्थकेअर हबमध्ये ॲलोपॅथी आणि आयुर्वेदिक रुग्णालये, गंभीर आजारांसाठी देखभाल केंद्रे, संशोधन आणि निदान केंद्रे, वैद्यकीय आणि नर्सिंग संस्था इ. समाविष्ट असतील. ही शैक्षणिक आणि आरोग्य सेवा केंद्रे विकसित करण्यासाठी धोरणात्मक फ्रेमवर्कची शिफारस करण्यासाठी राज्यस्तरावर खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदाधिकारी/अधिकाऱ्याचे पदनाम | धारण केलेले पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव, महसूल विभाग | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग | समन्वयक |
| ३ | अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ६ | सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग | सदस्य |
| ७ | सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा :-**

१) प्रत्येक विभागात किमान १ ग्रीनफील्ड किंवा ब्राऊनफील्ड शैक्षणिक / वैद्यकीय संकुल स्थापन करण्यासाठी जागा सुचविणे,

२) शैक्षणिक / वैद्यकीय संकुल स्थापनेसाठी आवश्यक असलेल्या किमान क्षेत्रांची शिफारस करणे,

३) शैक्षणिक/ वैद्यकीय संकुलामध्ये समाविष्ट करावयाच्या शैक्षणिक अभ्यासक्रमाच्या शाखा / संशोधन / कौशल्य संस्थांच्या संदर्भातील शिफारस करणे,

४) प्रकल्पाच्या उभारणीसाठी विविध प्रकारच्या सवलती तसेच आर्थिक प्रोत्साहनाचे पर्याय सुचविणे, उदाहरणार्थ CAPEX, OPEX, कर सवलत इ.

५) नवीन शिक्षण आणि आरोग्यसेवा धोरणे, बहुविद्याशाखीय दृष्टीकोन इत्यादींचा अवलंब करण्याबाबत शिफारस करणे,

२. सदर समिती शासन निर्णयाच्या दिनांकापासून २ महिन्यांच्या आत आपला अहवाल शासनास सादर करेल.

३. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३२५११२५५१३११६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Devara Rajagopal

Digitally signed by Devara Rajagopal
DN: c=IN, o=Personal, title=3456, pseudonym=C75542A781DE1B293AFD1058E70876A370106D00, 2.5.4.20=289c22071cb588fd531df022c29ec89276ede6f8aa500df11ff3b1b80b6962cd, postalCode=411014, st=Maharashtra, serialNumber=742368EFBE36A0EB883C9937836383A8BE11EB15DECB8029209DB2953176E175, cn=Devara Rajagopal
Date: 2023.03.25 11:30:31 +05'30'

**( डॉ. राजगोपाल देवरा )**
अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,

९. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. मा. उप मुख्यमंत्री (नियोजन) यांचे सचिव, उप मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
११. सर्व मा. मंत्री महोदय यांचे खाजगी सचिव,
१२. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
१३. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
१४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), विधानभवन, मुंबई,
१५. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), विधानभवन, मुंबई,
१६. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई / औरंगाबाद / नागपूर,
१७. *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई / औरंगाबाद / नागपूर,
१८. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / औरंगाबाद / नागपूर,
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
२०. महासंचालक, माहिती जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२१. सर्व विभागीय आयुक्त/ सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
२३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
२४. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपरिषदा,
२५. सह सचिव (का-१४१२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६. सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२७. निवडनस्ती, कार्यासन-१४१२, नियोजन विभाग,
(*पत्राने)